संपकालीन कर्मचाऱ्यांच्या [१९७७-७८ चा संप] शासकीय सेवेत वर्ग ३ व ४ मध्ये नियुक्त्या.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक एसटीके-१०८४/०/सीआर-९८/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २७ नोव्हेंबर १९८४.

वाचा:[१] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसटीके-१०७८/७१८/४११/१६-अ, दिनांक ११ मे १९७८.

[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसटीके-१०८३/सीआर-३८/१६-अ, दिनांक २९ सप्टेंबर १९८३.

परिपत्रक: शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसटीके/१०७८/७१८/४११/१६-अ, दिनांक ११ मे १९७८ अन्वये संपकालीन कर्मचाऱ्यांना ते इतर दृष्ट्या पात्र असतील तर शासकीय सेवेत वर्ग ३ मधील तात्पुरत्या पदावर व वर्ग ४ मधील पदावर भरती करिता पसंतीक्रम देण्यात आला आहे. जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे असलेल्या संपकालीन कर्मचाऱ्यांच्या यादीतील संबंधित पदासाठी आवश्यक पात्रता व योग्यता असलेल्या व्यक्तींची नावे नियुक्ती अधिकाऱ्यांकडे पाठवावयाची असतात. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, नियुक्ती अधिकारी त्यांच्याकडे नियुक्त करण्यात आलेल्या संपकालीन कर्मचाऱ्यांची नावे संबंधित जिल्हाधिकाऱ्यांस कळवीत नाहीत त्यामुळे जिल्हाधिकाऱ्यांकडून अशा कर्मचाऱ्यांची पुन्हा पुन्हा शिफारस करण्यात येते.

सर्व मंत्रालयीन विभागांना आणि विभाग प्रमुखांना असे सूचित करण्यात येते की, जिल्हाधिकाऱ्यांनी शिफारस केलेल्या संपकालीन कर्मचाऱ्यांच्या त्यांच्या कार्यालयात नियुक्त्या करण्यात आल्यानंतर तात्काळ तसे जिल्हाधिकाऱ्यांना कळविण्यात यावे. तसेच संपकालीन कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या रिक्त पदांवर [ Clear vacancies ] किंवा रजेच्या कालावधीकरिता करण्यात आलेल्या आहेत हेही जिल्हाधिकाऱ्यांस कळवावे.

प्र. द. माळवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग.

शामसु-रोटा-साप्रवि-एच-६०४[१५००-१२-८४]